महाराष्ट्र शासन

क्र.सकआ-२०१०/प्र.क्र. २७२ /आस्था-२
सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक - १२ ऑगस्ट, २०१०

संदर्भ - (१) महाराष्ट्र लोकसेवा आयोगाचे पत्र क्र. ९६६(२१)/५११०/पंधरा, दि. ७ एप्रिल, २०१०
(२) महाराष्ट्र लोकसेवा आयोगाचे पत्र क्र. ९६६(२१)/५११०/पंधरा, दि. १ जून, २०१०
(३) शासन आदेश, समक्रमांक, दि. २९/७/२०१०

## आदेश

या विभागाच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील संचालक, समाजकल्याण, पुणे यांच्या आस्थापनेवरील विशेष जिल्हा समाजकल्याण अधिकारी व तत्सम गट-अ संवर्गातील (वेतन बँड रु.९३००-३४८००, ग्रेड पे रु.४६००) रिक्त पदावर नामनिर्देशनाने नियुक्ती देण्याकरीता महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने संदर्भाधीन पत्रांव्दारे एकूण ३२ (बत्तीस) उमेदवारांची शिफारस केली आहे. त्यापैकी ज्या उमेदवारांची शैक्षणिक अर्हता / वैद्यकीय / चारित्र्य / जाती प्रमाणपत्र पडताळणी पुर्ण झाली आहे अशा १४ उमेदवारांना संदर्भाधिन दि. २९/७/२०१० च्या शासन आदेशान्वये नियुक्ती देण्यात आली आहे. त्यानंतर आता ज्या उमेदवारांची शैक्षणिक अर्हता / वैद्यकीय / चारित्र्य / जाती प्रमाणपत्र पडताळणी पुर्ण झाली आहे अशा पुढील एकूण १० (दहा) उमेदवारांना विशेष जिल्हा समाजकल्याण अधिकारी व तत्सम गट -अ या संवर्गात परिविक्षाधीन अधिकारी म्हणून त्यांच्या नावासमोर दर्शविल्याप्रमाणे नियुक्तीने पदस्थापना देण्यात येत आहे.

| अ.क्र. | उमेदवाराचे नाव व पत्ता | प्रवर्ग | गुणवत्ता क्रमांक | पदस्थापना |
|---|---|---|---|---|
| १ | श्री. सिध्दार्थ लहानुजी गायकवाड, एलआयएजी-२६३, प्लॉट नं. २०, राजगृहनगर (म्हाडा), नारी, पो. उप्पल वाडी, वॉर्ड नं. २, नागपूर ४४००२६ | अजा | ६ | समाज कल्याण अधिकारी, जिल्हा परिषद, अकोला |
| २ | श्रीमती अमिनाबी मुसा शेख, मु. पो. शेळगाव, ता. इंदापूर, जि. पुणे ४१३११४ | अमागास (म) | ७ | समाज कल्याण अधिकारी, जिल्हा परिषद, बीड |
| ३ | श्री. जलिल शेख मोला शेख C/o, लाईनमन, सीतामाई निवासाच्या समोर, मस्तानपुरा, जि. नांदेड ४३१६०२ | अमागास | ८ | समाज कल्याण अधिकारी, जिल्हा परिषद, जालना |
| ४ | श्री. विजय शामराव साळवे, मु. तेल्हारा, पो. बोरगाव काकडे, ता. चिखली, जि. बुलढाणा ४४३२०१ | अजा | १० | समाज कल्याण अधिकारी, जिल्हा परिषद, वाशिम |
| ५ | श्री. उमेश देवराम सोनावणे, पोस्ट खामगाव कॉलनी, ता. जुन्नर, पुणे ४१०५०२ | अजा | १२ | समाज कल्याण अधिकारी, जिल्हा परिषद, परभणी |
| ६ | श्री. रविंद्र छगन कदम, मु. पो. सुस्ते, ता. पंढरपूर, जि. सोलापूर, ४१३३०४ | अमागास | १९ | समाज कल्याण अधिकारी, जिल्हा परिषद, रायगड |
| ७ | श्री. देवसूदन नामदेव धारगावे, C/o प्रमोदडी. मारवाडे, १९, बंडू-सोनी लेआऊट, संभाजी नगर, नागपूर ४४००२२ | अजा | २० | समाज कल्याण अधिकारी, जिल्हा परिषद, सिंधुदुर्ग |
| ८ | श्री. परशराम मारुती शहापूरकर, घर क्र. १३२, प्रतापगडनगर, हडको, औरंगाबाद | अमागास | २३ | समाज कल्याण अधिकारी, जिल्हा परिषद, गोंदीया |
| ९ | श्रीमती सलिमा मैताब तडवी, भायखळा सह्याद्री बिल्डींग, रुम नं. १८, तिसरा माळा, क्लेअर रोड, भायखळा, मुंबई ४०००१८ | अज (म) | २४ | समाज कल्याण अधिकारी, जिल्हा परिषद, ठाणे |
| १० | श्री. राकेश गोकुळ पाटील, मु. पो. भडगाव (पेठ), जि. जळगाव ४२४१०५ | इमाव | २५ | समाज कल्याण अधिकारी, जिल्हा परिषद, नंदुरबार |

(कृ.मा.प.)

२.	तसेच शासन आदेश समक्रमांक दि. २९ जुलै २०१० रोजीच्या आदेशामध्ये अंशतः बदल करून श्रीमती जया विनोद राऊत, अ.जा.(गुणवत्ता क्र.२) यांना समाज कल्याण अधिकारी, जिल्हा परिषद, अकोला ऐवजी समाज कल्याण अधिकारी, जिल्हा परिषद, वर्धा या पदावर सुधारीत पदस्थापना देण्यात येत आहे.

३.	उपरोक्त परिविक्षाधीन अधिकाऱ्यांना पुढे नमूद केलेल्या अटींच्या अधिन राहून ही नियुक्ती देण्यात येत आहे.

(१) उपरोक्त परिविक्षाधीन अधिकाऱ्यांची ही नियुक्ती, ते ज्या दिनांकास सदर पदावर रुजु होतील त्या दिनांकापासून, दोन वर्षाच्या परिविक्षा कालावधीसाठी राहील. या परिविक्षा कालावधी मध्ये त्यांना शासन अधिसूचना, समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य व क्रिडा विभाग, क्र. बीसीई १९६९/३६००/का -४, दि.२४/९/१९७५ अन्वये विहित करण्यात आलेली विभागीय परीक्षा उत्तीर्ण करावी लागेल. विहित मुदतीत विभागीय परीक्षा उत्तीर्ण न झाल्यास या अधिनियमातील तरतुदीनुसार त्यांचा सेवा समाप्त करण्यात येतील. याशिवाय शासनाने विहित केलेल्या हिंदी / मराठी या भाषा परीक्षा सुध्दा विहित मुदतीत उत्तीर्ण कराव्या लागतील. परिविक्षा कालावधीचे एक वर्ष पुर्ण झाल्यानंतर त्यांची वेतनवाढ काढण्यास अनुमती देण्यात येईल. त्यानंतरची वेतन वाढ मात्र त्यांनी परिविक्षा कालावधीत समाधानकारकरित्या पुर्ण केल्यानंतरच अनुज्ञेय होईल.

(२) या परिविक्षाधीन अधिकाऱ्यांना देण्यात येणाऱ्या प्रशिक्षणाचा कालावधी हा परिविक्षा कालावधीमध्ये अंतर्भूत राहील.

(३) परिविक्षा कालावधीत या परिविक्षाधीन अधिकाऱ्यांनी कामाचा अपेक्षित दर्जा प्राप्त न केल्यास, त्यांचे काम किंवा वर्तणुक अयोग्य अथवा अननुरुप आढळल्यास ते सेवेतून कमी करण्यास पात्र ठरतील.

(४) उपरोक्त परिविक्षाधीन अधिकाऱ्यांनी हे आदेश मिळाल्यापासून एक महिन्याच्या कालावधीत शासन सेवेत त्यांना नियुक्ती देण्यात आलेल्या पदावर रुजू व्हावे. त्याकरीता त्यांनी संचालक, समाजकल्याण, पुणे यांचेशी त्वरित संपर्क साधावा. जे परिविक्षाधीन अधिकारी या मुदतीत रुजू होणार नाहीत, ते महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने गुणवत्तेनुसार दिलेली त्यांची ज्येष्ठता गमावण्यास पात्र ठरतील. तसेच त्यांचा नियुक्तीचे हे आदेश कोणतीही पूर्व सूचना न देता रद्द करण्यात येईल.

(५) असेही नमूद करण्यात येते की, एकूण सर्व ३२ उमेदवार नियुक्ती स्विकारण्यासाठी हजर झाले आहेत. त्यापैकी ज्या १४ उमेदवारांची पडताळणी पुर्ण झाली आहे त्या उमेदवारांना संदर्भाधीन शासन आदेश, दि.२९/७/२०१० अन्वये नियुक्ती देण्यात आलेली आहे. या व्यतिरिक्त १० उमेदवारांना या आदेशाअन्वये नियुक्ती देण्यात येत आहे. इतर उमेदवारांची पडताळणी झालेली नाही. या कारणास्तव त्यांना पदस्थापना देता आलेली नाही. मात्र त्यामुळे आता ज्या १० उमेदवारांना नियुक्ती देण्यात येत आहे व पुर्वी ज्या १४ उमेदवारांना नियुक्ती देण्यात आली आहे ते त्या इतर उमेदवारांपेक्षा जेष्ठ ठरणार नाहीत. तर त्यांचे महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने दिलेले गुणवत्ताक्रम कायम राहतील व त्या प्रमाणेच त्यांची आपापसातील सेवा ज्येष्ठता कायम राहील, याची नोंद घेण्यात यावी.

४.	सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संगणक संकेतांक क्रमांक २०१००८११२०५३२८००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( कि. पो. वडते )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,
संबंधित अधिकारी,

(पुढे पहा)

प्रत,
संचालक , समाजकल्याण, पुणे.
आयुक्त, अपंगकल्याण, पुणे
उपसचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (पत्राने)
सर्व उपसचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
संचालक, विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण, पुणे
सचिव (सामाजिक न्याय) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
मुख्य कार्यकारी अधिकारी, जि.प.,अकोला, बीड, जालना, वाशिम, परभणी, रायगड, सिंधुदुर्ग, गोंदीया, ठाणे, नंदुरबार.
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
जिल्हा कोषागार अधिकारी, अकोला, बीड, जालना, वाशिम, परभणी, रायगड, सिंधुदुर्ग, गोंदीया, ठाणे, नंदुरबार.
मा. मंत्री (सा.न्या.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
मा. राज्यमंत्री (सा.न्या.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
सर्व विभागीय समाजकल्याण अधिकारी.
सर्व विशेष जिल्हा समाजकल्याण अधिकारी.
सर्व समाजकल्याण अधिकारी, गट-अ, जि.प.
निवड नस्ती ( आस्था-२ )